“आकांक्षीत जिल्हा कार्यक्रम” अंतर्गत सहभागी जिल्ह्यांचा गुणवत्ता क्रमांक सुनिश्चित करण्यासाठी तीन टप्पे पडताळणी धोरण लागू करण्याबाबत प्रशासकीय विभाग स्तरावर अपेक्षित कार्यवाही करणे.

**महाराष्ट्र शासन**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांकः आजिका २०२२ /प्र. क्र. ९ /पापु ०५**
जी. टी. रुग्णालय संकुल, ७ वा मजला,
मंत्रालय, मुंबई ४०० ००१
तारीख: ५ एप्रिल २०२२

वाचा :-

१) नीती आयोग, यांचे पत्र, दिनांक २३ ऑगस्ट २०२१.
२) नियोजन विभागाचे शासन पत्र, क्र.आजिका २०२१/प्र.क्र.३९/का.१४१२, दि. १५ फेब्रुवारी,२०२२

**शासन परिपत्रक :-**

देशात जल जीवन मिशन व स्वच्छ भारत अभियान हे कार्यक्रम चालू आहेत. काही जिल्हयांची दुर्गमता आणि त्यांच्यासमोरील आव्हानांमुळे, विशेषत: आरोग्य आणि पोषण, शिक्षण, कृषि आणि जलसंपदा, कौशल्य विकास आणि आर्थिक समावेशन आणि पायाभूत सुविधा, पाणी व स्वच्छता यांसारख्या क्षेत्रातील प्रगती काही जिल्ह्यांमध्ये तुलनेने कमी होती. नवीन भारत २०२२ च्या सर्व समावेशक विकासासाठी, विकास प्रक्रिया टिकवून ठेवण्यासाठी या जिल्ह्यांमध्ये जलद प्रगती आवश्यक आहे. त्यासाठी केंद्र शासनाने देशातील अशा ११२ जिल्ह्यांचा झपाट्याने कायापालट करण्यासाठी जानेवारी २०१८ मध्ये “आकांक्षीत जिल्हा कार्यक्रम ” सुरू केला. ह्या कार्यक्रमात महाराष्ट्रातील नंदुरबार, उस्मानाबाद, वाशिम व गडचिरोली या जिल्हयांचा समावेश आहे. या जिल्ह्यांचा गुणवत्ता क्रमांक उन्नत व सुनिश्चित व्हावा यासाठी नीती आयोगाने “ आकांक्षीत जिल्हा कार्यक्रम ” अंतर्गत तीन टप्पे पडताळणी धोरण लागू केले आहे. त्यामध्ये जिल्ह्यातील सबंधित योजनांची माहिती, केंद्र

शासनाने तयार केलेल्या Champions of Change या dashboard वर up load करावयाची आहे. सदर माहितीची गुणवत्ता चांगली राहण्यासाठी व Performance Ranking ची पद्धत पारदर्शी व automated केलेली आहे. त्यासाठी तीन टप्पा पद्धत अवलंबलेली आहे. सदर कामाच्या पर्यवेक्षीय पडताळणीसाठी प्रत्येक जिल्ह्यात एक पर्यवेक्षीय अधिकारी नेमावा असे केंद्र शासनाने सूचित केले आहे. त्यानुसार पुढीलप्रमाणे पर्यवेक्षीय अधिकारी प्राधिकृत करण्यात येत आहेत.

उप मुख्य कार्यकारी अधिकारी (पाणी व स्वच्छता ) तथा प्रकल्प संचालक, जल जीवन मिशन, जिल्हा परिषद, नंदुरबार, उस्मानाबाद, वाशिम व गडचिरोली.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक २०२२०४०५१५२६११२०२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Vasant Bhimrao Mane

Digitally signed by Vasant Bhimrao Mane
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER SUPPLY AND SANITATION DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=280e2beac20f526041fee94f6226522e1407a7f6aa0b06c8769634d48c2976bc, pseudonym=04E9E52AD2D2BFBC7A8BAB7F38309149E2A32DAE, serialNumber=4412BECACEF186C3494A7DFFC4896B9FFD9D66E8EC00DF8E35709DC13741075D, cn=Vasant Bhimrao Mane
Date: 2022.04.05 16:26:29 +05'30'

**(वसंत माने )**

शासनाचे उप सचिव

**प्रति,**

१) उप मुख्य कार्यकारी अधिकारी (पाणी व स्वच्छता ) तथा प्रकल्प संचालक,जल जीवन मिशन, जिल्हा परिषद, नंदुरबार, उस्मानाबाद, वाशिम व गडचिरोली यांना योग्य त्या कार्यवाहीसाठी.

**प्रत, आवश्यक त्या कार्यवाहीसाठी अग्रेषित.**

१) विभागीय आयुक्त, नाशिक, औरंगाबाद, अमरावती व नागपुर
२) जिल्हाधिकारी नंदुरबार, उस्मानाबाद, वाशिम व गडचिरोली.
३) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, नंदुरबार, उस्मानाबाद, वाशिम व गडचिरोली.
४) अवर सचिव (कार्यासन - १४१२ ), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
५) प्रधान सचिव ( पा.पू. व स्व. वि. ) यांचे स्वीय सहाय्यक.
६) निवड नस्ती, कार्यासन, पापु-०५.